कोल्हापूर महानगरपालिका हद्दीतून आयात
होवून निर्गत होणा-या मालाच्या देखरेख फी
मध्ये वाढ करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विकास,
**क्रमांक** - कोमपा-११०४/१३०५/प्र.क्र.-९९/नवि.-२५,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
**दिनांक :-** ९ ऑगस्ट, २००४.

**पहा :-** १) आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका यांचे क्रमांक - जकात प्रधान कार्यालय, वशि-२/ ५२१/२००४, दिनांक ४.६.२००४ रोजीचे पत्र
२) कोल्हापूर महानगरपालिका स्थायी समिती ठराव क्रमांक २०७, दि.- ७.५.२००४

**शासन निर्णय :-** कोल्हापूर महानगरपालिकेने त्यांच्या दिनांक ४.६.२००४ रोजीच्या पत्रान्वये मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील कलम १४७ व ४६६ (१) (एक) अन्वये कोल्हापूर महानगरपालिका हद्दीत आयात होवून निर्गत होणा-या मालाच्या देखरेखीबद्दल आकारण्यात यावयाच्या देखरेख फी मध्ये पुढील प्रमाणे वाढ करण्याचा प्रस्ताव स्थायी समितीच्या मंजूरीने शासनास सादर केला आहे :-

१) ज्यावेळी मोटर व्हेईकल ॲक्ट, १९३९ ने अधिकार दिलेल्या सरकारी नोंद अधिका-याकडे नोंदलेला अगर त्या ॲक्ट प्रमाणे व्यापारी दाखला घेवून ताबडतोब निर्गत करण्याचे हेतूने आयात करते वेळचा माल मोटार कार, मोटार बस, मोटार सायकल, मोटार चेसीस, ट्रॅक्टर, मोटर रिक्षा अगर मोटार पॉवरने चालणारे दुसरे कोणतेही वाहन प्रत्येक वाहनास रु.१२/- ऐवजी रु.२०/- (रुपये वीस फक्त)

२) ज्यावेळी ताबडतोब निर्गत होणार माल मोटर लॉरी अगर मोटर पॉवरवर चालणा-या वाहनात असेल तेव्हा प्रत्येक वाहनास रुपये १२ ऐवजी रुपये २०/- (रुपये वीस फक्त)

३) ज्यावेळी ताबडतोब निर्गत होणारा माल मोटर अगर मोटर पॉवरवर चालणा-या वाहना व्यतिरिक्त इतर वाहनात असेल त्यावेळी अशा प्रत्येक वाहनास रु.६/-ऐवजी रु.१०/- (रुपये दहा फक्त)

४) ज्यावेळी ताबडतोब निर्गत होणारा माल एखाद्या इसमाने वाहना व्यतिरिक्त आणि इतर कोणत्याही साधनाने नेला जात असेल त्यावेळी माल नेणा-या प्रत्येक इसमामागे रुपये ६ ऐवजी रुपये १०/- (रुपये दहा फक्त)

२.      कोल्हापूर महानगरपालिकेच्या उपरोक्त प्रस्तावास मुंबई [illegible] अधिनियम १९४९ मधील कलम ४६६ (२) अन्वये शासन मंजूरी देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( प्र. मा. माळवदकर )
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका, कोल्हापूर. ( २ प्रती )
(२) कक्ष अधिकारी, (कार्यासन - २१,२२,२३,२४,२६,२८), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
(३) निवड नस्ती (नवि-२५)